**विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करणे. सन २०२४-२५ करिता निधी वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तंत्रनि-२०२४/प्र.क्र. १३/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १० एप्रिल, २०२४

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: टिईडी-२०१० /(३३४/२००९)/तांशि-५, दिनांक १३ सप्टेंबर, २०११,

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: टिईडी-२०११/(३४७/२०११)/तांशि-५, दिनांक १९ जुलै, २०१२,

३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: मान्यता-२०१४/प्र.क्र.७०/तांशि-५, दिनांक ०८जुलै, २०१४,

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०२४

५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. १५/तंशिसं/अर्थसं/निधी/२०२४/३५, दि.५ एप्रिल, २०२४

प्रस्तावना:-

संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७ ठिकाणी, संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड या ५ ठिकाणी व संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१४-१५ पासून पुणे, लातूर, हिंगोली या ३ ठिकाणी अशा एकूण १५ ठिकाणच्या शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करण्यात आली आहे. त्यानुसार "मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (३०) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, (२२३५ बी ०२२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ करिता वेतन व इतर उद्दिष्टांकरिता रु.३४,७०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन परिपत्रकास अनुसरून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

__शासन निर्णय-__

विद्यमान १५ शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळीवरील खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ चे शासन परिपत्रकास अनुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता आवश्यक असणारा अनिवार्य कार्यक्रमावरील खर्चाकरिता **रु. १,५०,००,००० /- (अक्षरी रूपये एक कोटी पन्नास लाख फक्त)** इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| **अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे (२२३५ बी ०२२)** | **सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेले अनुदान** | **वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१/०४/२०२४ नुसार बीम्स प्रणालीवर वितरणाकरिता उपलब्ध निधी** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|
| ०१, वेतन | २५,२०,००,००० | १,५०,००,००० | १,५०,००,००० |
| **(अक्षरी एक कोटी पन्नास लाख फक्त)** | | **एकूण** | **१,५०,००,०००** |

२. सदर तरतूद संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते “नियंत्रक अधिकारी”आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहतील.

३. या योजनेंतर्गत अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

४. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय, कार्यालयीन आदेश, वित्तीय नियमावली, सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्य नियमावली, भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल, वित्तीय कार्यपध्दती आणि वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या संदर्भाधीन सूचना यांचा अवलंब करावा.

५. लेखानुदानाद्वारे प्राप्त झालेल्या निधीचे वितरण करतांना लोकसभा निवडणुक -२०२४ च्या आदर्श आचारसंहितेचे पालन होत आहे, याबाबत खात्री करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४ मधील अटींची पुर्तता होत असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.”

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०४१०१४५५४६०८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANAND NARAYANRAO BHONDVE

Digitally signed by ANAND NARAYANRAO BHONDVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D040EF80427E869FA7C6F2F326EAF61F9B4591294C9BE6229580E816D54D3859, cn=ANAND NARAYANRAO BHONDVE
Date: 2024.04.10 15:07:59 +05'30'

**( आ.ना. भोंडवे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन संस्था ( ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर, मुंबई उपनगर,रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड, पुणे, लातूर व हिंगोली )
६) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
८) सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत
९) नियोजन विभाग का. १४७५,
१०) वित्त विभाग, व्यय-१/ अर्थ-३ व १४,
११) अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कम संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना बी.डी.एस. वर तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.
१२) निवडनस्ती.